**सन २०१३-१४ या आर्थिक वर्षातील महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाने शासनास दयावयाच्या प्रवासी कराचे शासनाने महामंडळास दयावयाच्या सवलत मुल्यांच्या प्रतिपूर्तीपोटी पुस्तकी समायोजन.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-०७१५/प्र.क्र. ३९६/परि-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ सप्टेंबर, २०१५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र. एसटीसी ३४००/६३१/सीआर ३१/परि-१, दि. २०.०६. २०००
२) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.मा.प.महामंडळ यांचे पत्र क्र.राप/लेखा/ नोंदणी /सवलत/१३२३, दि.१५.०५.२०१५.
३) शासन निर्णय क्र.एसटीसी०३१५/प्र.क्र.१७५ /परि १, दि.२७ मार्च, २०१५.
४) शासन निर्णय क्र. एसटीसी-०७१५/प्र.क्र.३९६/परि-१, दि.०८.०९.२०१५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाला प्रवासी कराची रक्कम १७.५ टक्के या दराने शासनास अदा करावी लागते. महामंडळाने प्रवासी कराच्या १२ टक्के प्रमाणे येणारी प्रवासी कराची रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित ५.५ टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास देण्यात यावी, असे आदेश संदर्भाधिन दि.२०.०६.२००० च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. शासनास प्राप्त होणारा १२% प्रवासी कर व महामंडळास विविध सवलत मूल्याची प्रतिपूर्तीपोटी दयावयाची रक्कम यांचे पुस्तकी समायोजन करण्यात येते. त्यानुसार दि. ३१.०३.२०१४ अखेर महामंडळाने १२% प्रमाणे प्रवासी कराची शासनास दयावयाची रक्कम रु.२८३.८७ कोटी एवढी प्रलंबीत आहे. त्याचप्रमाणे दि.३१.०३.२०१५ अखेर विविध सवलत मूल्यांपोटी शासनाने महामंडळास दयावयाची रक्कम रु.१२१७.२५ कोटी एवढी प्रलंबित आहे. संदर्भाधिन अ.क्र. ४, दि.०८.०९.२०१५ चे शासन निर्णयान्वये ५.५% प्रमाणे रु.२८३.८७ कोटी प्रवासी कराची रक्कम भांडवली अंशदान म्हणून समायोजित करण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. तथापि, संदर्भाधिन अ.क्र.३, दि.२७.०३.२०१५ च्या शासन निर्णयान्वये ५.५% प्रमाणे दि.३१.०३.२०१५ अखेरपर्यंतची रु.१३९,६७,८९,७५५/- प्रवासी कराची रक्कम भांडवली अंशदान म्हणून समायोजित करण्यात आलेली असल्याने सदंर्भाधिन अ.क्र.४, येथील दि.०८.०९.२०१५ चा शासन निर्णय रद्द करण्याची आणि शासनाने सवलत मूल्यांपोटी महामंडळास दयावयाच्या प्रलंबित रक्कम रु.१२१७.२५ कोटीपैकी महामंडळाने शासनास दयावयाच्या १२% प्रमाणे प्रवासी कराची रक्कम रु.२८३.८७ कोटी पुस्तकी समायोजनाद्वारे मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन अ.क्र.४, वरील दि.०८.०९.२०१५ रोजी निर्गमित केलेला शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास विविध प्रवास सवलत मूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी द्यावयाच्या शिल्लक रक्कमेपैकी रु.२८३,८७,१२,८४३/- (अक्षरी रुपये दोनशे त्र्याअंशी कोटी सत्त्याऐंशी लक्ष बारा हजार आठशे त्रेचाळीस फक्त) रक्कम दिनांक ३१.०३.२०१४ अखेर प्रलंबित असलेल्या १२% प्रमाणे प्रवासी कराच्या रक्कमेपोटी पुस्तकी समायोजन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च सन २०१५-१६ च्या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर रक्कम गृह विभाग, मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (००) ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त, (०१)(०१) परिवहन आयुक्त आस्थापना-योजनेतर (द.२०४१ ००१८), ३३ - अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली खर्च दर्शवून ही रक्कम ००४२-माल व उतारुंवरील कर- १०६, कर वसूली, (०१) (०२) उतारुंवरील करापासून मिळालेल्या जमा रक्कमा (००४२ ००६२) या लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने प्रवासी कराची रक्कम जमा दर्शविण्यात यावी.

४. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन करण्याची कार्यवाही करावी.

५. हा निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५८/१५/व्यय-८, दिनांक ०६/०७/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१५०९२२१५१२४२२८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nitin J Ghiratkar

Digitally signed by Nitin J Ghiratkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nitin J Ghiratkar
Date: 2015.09.22 15:18:48 +05'30'

**(नि.ज्यो.घिरटकर)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
२.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

४. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
७.वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
८.वित्त विभाग (व्यय -८/साऊ/ अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९.गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४) मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती/परि १.